"चांदा ते बांदा" योजनेंतर्गत जिल्हास्तरावर कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांना समायोजनाद्वारे पदस्थापना देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक-इएसटी-११२०/प्र.क्र.३८/ का.१४२७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २५ जून, २०२०

**संदर्भ :-** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.डीएपी-१०१५/प्र.क्र.५१/का.१४८१, दि.२९ जून, २०१६
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.डीएपी-१०१६/प्र.क्र.१८६/का.१४८१, दि.१८ नोव्हेंबर, २०१६

**शासन आदेश**

राज्य शासनाने चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यांमध्ये "रिसोर्स बेस्ड इंटेसिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट" हा पथदर्शी कार्यक्रम राबविण्यासाठी संदर्भाधीन अ.क्र.१ वरील शासन निर्णयान्वये "चांदा ते बांदा" ही योजना राबविण्यास मान्यता दिलेली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी चंद्रपूर व सिंधुदुर्ग या दोन जिल्ह्यांसाठी संदर्भाधीन अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये जिल्हास्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्षामध्ये पदनिर्मिती करण्यास मान्यता दिलेली आहे. "चांदा ते बांदा" ही योजना सन २०१६-१७ ते सन २०१९-२० या चार वर्षांच्या कालावधीसाठी राबविण्यात येणार होती. त्यामुळे सदर योजनेचा कालावधी दि.३१/०३/२०२० रोजी संपुष्टात आला. ही वस्तुस्थिती विचारात घेऊन चंद्रपूर व सिंधुदुर्ग जिल्ह्यांमध्ये जिल्हा व्यवस्थापन कक्षासाठी निर्माण केलेल्या पदांनाही मुदतवाढ देण्यात आलेली नाही. यास्तव, सदर पदांवर कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांना समायोजनाद्वारे अन्य पदांवर पदस्थापना देणे आवश्यक आहे. चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यांमधील जिल्हास्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्षामध्ये कार्यरत असलेल्या खालील तक्त्यात दर्शविलेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या नांवासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविल्यानुसार पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व सध्याचे कार्यालय | समायोजनाने पदस्थापनेचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १ | श्री.सु.अं.धोंगडे, जिल्हा समन्वयक, जिल्हा प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, चांदा ते बांदा योजना, चंद्रपूर. | जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), जिल्हा मानव विकास समिती कार्यालय, चंद्रपूर. |
| २ | श्री. अतुल राजाराम चव्हाण, समन्वयक (मूल्यमापन), जिल्हा व्यवस्थापन कक्ष, चांदा ते बांदा योजना, चंद्रपूर. | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), जिल्हा मानव विकास समिती कार्यालय, चंद्रपूर. |
| ३ | श्री. सुचित रामचंद्र वंजारे, समन्वयक (मूल्यमापन), जिल्हा व्यवस्थापन कक्ष, चांदा ते बांदा योजना, सिंधुदुर्ग. | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती कार्यालय, सिंधुदुर्ग. |

२. समायोजनाने पदस्थापना दिलेल्या पदावर पदस्थापना स्वीकारण्यासाठी उपरोक्त तक्त्यातील अधिकाऱ्यांना या आदेशान्वये कार्यमुक्त करण्यात येत आहे. त्यांनी सामायोजनाने दिलेल्या पदाचा कार्यभार स्वीकारावा व तसे शासनास आणि संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना अवगत करावे.

३. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन आदेश उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र.२०२००६२५१८०३३०९८१६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

आदेशानुसार,

Tushar Purushottam Hirlekar

Digitally signed by Tushar Purushottam Hirlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6dd848a31422ed36ba4503d4744b6dc20833c851babace12b16b7bba3f67cca2, cn=Tushar Purushottam Hirlekar
Date: 2020.06.30 15:28:24 +05'30'

**( तु.पु.हिर्लेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२) मा.मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव.
३) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, कोकण व नागपूर.
४) आयुक्त, मानव विकास, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद.
५) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर व सिंधुदुर्ग.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर व सिंधुदुर्ग.
७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
८) सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण व नागपूर.
९) सहसंचालक, मानव विकास, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद.
१०) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण व नागपूर.
११) उपसचिव (का.१४१८), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, चंद्रपूर व सिंधुदुर्ग.
१४) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, चंद्रपूर व सिंधुदुर्ग.
१५) श्री.सु.अं.धोंगडे, जिल्हा समन्वयक, जिल्हा प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, चांदा ते बांदा योजना, चंद्रपूर.
१६) श्री.अतुल राजाराम चव्हाण, समन्वयक (मूल्यमापन), जिल्हा व्यवस्थापन कक्ष, चांदा ते बांदा योजना, चंद्रपूर.
१७) श्री.सुचित रामचंद्र वंजारे, समन्वयक (मूल्यमापन), जिल्हा व्यवस्थापन कक्ष, चांदा ते बांदा योजना, सिंधुदुर्ग.
१८) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१९) निवडनस्ती.